**नंदुरबार जिल्ह्यातील धडगांव धनाजे बु. शेलकुई राजबर्डी भूषा रस्ता इजिमा-७१ ची साखळी क्र. ०/०० ते २७/०० ही लांबी प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१७/प्र.क्र.१६८/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १९ ऑगस्ट, २०१७

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.जा क्र. का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ता दर्जोन्नत/२२७९/२०१७, दिनांक १६/०५/२०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,नाशिक यांनी संदर्भाधीन पत्रान्वये नंदुरबार जिल्ह्यातील धडगांव धनाजे बु. शेलकुई राजबर्डी भूषा रस्ता इजिमा-७१ मधील साखळी क्र. ०/०० ते २७/०० ही लांबी दर्जोन्नत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर रस्त्यावरील भुषा व परिसरातील आदिवासी पाडे हे सरदार सरोवर प्रकल्पाच्या बाधीत क्षेत्रात येत असून प्रकल्पग्रस्त आदिवासी जनतेला दळणवळणाच्या सुविधा उपलब्ध करण्याकरता सदर रस्ता महत्त्वाचा आहे. त्यामुळे हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा उपरोक्त प्रस्ताव व जिल्हा परिषद, नंदुरबार यांचा ठराव विचारात घेऊन धडगांव धनाजे बु. शेलकुई राजबर्डी भूषा रस्ता इजिमा-७१ मधील साखळी क्र. ०/०० ते २७/०० ही लांबी प्रजिमा- १३३ म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

उपरोक्त इजिमा रस्त्याची एकूण २७.०० कि.मी. लांबी प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत केल्यामुळे रस्ते विकास योजना २००१-२१ मधील प्रमुख जिल्हा मार्गाच्या नंदुरबार जिल्ह्यातील लांबीत २७.०० कि. मी. ने वाढ होवून एकूण लांबी ( ७६५.०६७ +२७.०० ) म्हणजे **७९२.०६७ कि. मी.** इतकी होईल व इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्यातील लांबीत २७.०० कि. मी. ने घट होऊन एकूण लांबी ( १४२०.०५५ - २७.०० ) म्हणजे **१३९३.०५५ कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०८१९१५२७५३८२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.08.19 15:21:04 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, नंदुरबार.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, धुळे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनानुसार या रस्त्यांची माहिती अद्ययावत करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.